**देवर्जन मध्यम प्रकल्प, ता. उद्‌गीर, जि. लातूर**
**द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : देवर्जन सुप्रमा-२००९/१५७/प्र.क्र.(५८/०९)/म.प्र.**
**मंत्रालय, मुंबई.**
**दिनांक :- ३० जुलै, २०१०**

पहावे :- १) शासन निर्णय क्रमांक : डीव्हिई/१०७७/१९५२/मप्र.१, दिनांक १२/१२/७७.
२) शासन निर्णय क्रमांक : १०९३/(११/९३)/म.प्र., दिनांक ८/६/१९९८.

**प्रस्तावना :-** लातुर जिल्हयातील उद्‌गीर तालुक्यातील देवर्जन मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्रमांक : डीव्हिई/१०७७/१९५२/मप्र.१, दिनांक १२/१२/७७ अन्वये (दरसुची १९७५-७६ वर आधारीत) रुपये ११७.२९ लक्ष (रुपये एक कोटी सतरा लक्ष एकोणतीस हजार फक्त) एवढया किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्‌नंतर दरसुचीतील वाढ, भुसंपादनाचे किंमतीतील वाढ, अभियांत्रिकी बदलामुळे वाढ, नवीन बाबींच्या समावेशामुळे वाढ व अनुषंगिक खर्चातील वाढ इत्यादीं मुळे प्रकल्पाच्या खर्चात वाढ होऊन प्रकल्पास शासन निर्णय क्रमांक : १०९३/(११/९३)/म.प्र., दिनांक ८/६/९८ अन्वये (दरसुची १९९१-९२ वर आधारीत) रुपये ८०९.८७ लक्ष (रुपये आठ कोटी नऊ लक्ष सत्त्याऐंशी हजार फक्त) एवढया किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. आता दरसुचीतील वाढीमुळे, भुसंपादन वाढीमुळे तसेच संकल्प चित्रातील बदलामुळे वाढ तथा जास्त दराच्या निविदा स्विकृतीमुळे वाढ इत्यादी वाढी मुळे प्रकल्पीय किंमतीमध्ये वाढ झाली आहे. यासाठी कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी सादर केलेल्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय अहवालास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासनाच्या आता या निर्णयाद्वारे लातुर जिल्हयातील उद्‌गीर तालुक्यातील देवर्जन मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २०००-०१ च्या दरसूचीवर आधारित रु.१८३०.४३ लक्ष (रुपये अठरा कोटी तीस लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) एवढया रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय

मान्यता प्रदान करण्यांत येत आहे. त्यांपैकी रु.१५७६.७३ लक्ष (रुपये पंधरा कोटी श्याहत्तर लक्ष त्र्याहत्तर हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रु.२५३.७० लक्ष (रुपये दोन कोटी त्रेपन्न लक्ष सत्तर हजार फक्त) आनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र १ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र २ मध्ये सुधारीत सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजीत वेळेत व सुधारीत प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.१/२०१०-११ वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे लातुर जिल्हयातील उद्‌गीर तालुक्यातील १८८२ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५४ आहे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२) (०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) देवर्जन मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र. संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार तसेच नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.१८८३/नि.वि., दिनांक ८.५.१० नुसार दिलेल्या सहमतीने व वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.१५३/व्यय-१२, दिनांक ३१.५.१० नुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करणेत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००७१२१६०६१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. स. गुजर )
शासनाचे अवर सचिव

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

वित्त विभाग (व्यय १२), अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६अ, मंत्रालय, मुंबई.

नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई.

कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.

आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, परळी वैजनाथ.

(सोबत सुधारीत अंदाजपत्रक)

कार्यकारी अभियंता, लातुर मध्यम प्रकल्प विभाग, लातुर.

स्वीय सहायक, मा. मंत्री (जलसंपदा) (कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ वगळून)
मंत्रालय, मुंबई.

स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.

स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

अवर सचिव (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप अभियंता (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यासने- जसंअ, निवसं-१, अर्थ-१, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यासन मध्यम प्रकल्प संग्रहार्थ.

निवड धारीका.

**तक्ता क्रमांक १**
**देवर्जन मध्यम प्रकल्प, ता. उद्‌गीर, जि. लातुर.**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा/देवर्जन/२००९/(५८/०९)/म.प्र.,**
**दिनांक ३०/७/१० चे सहपत्र.**

**द्वितीय सुधारीत अंदाजपत्रक उपशीर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १) | ''अे'' प्राथमिक सर्वेक्षण | २.०० |
| २) | ''बी'' भूसंपादन | ६७३.१३ |
| ३) | ''सी'' कामे | ४३०.९९ |
| ४) | ''डी'' विमोचक | ३१.५६ |
| ५) | ''ई'' फॉल्स | --- |
| ६) | ''एफ'' आर.एच.टी. कामे | ७२.९६ |
| ७) | ''जी'' ब्रिजेस | ३६.०९ |
| ८) | ''एच'' एस्केप | ६.२२ |
| ९) | ''के'' इमारती | १६.३८ |
| १०) | ''एल'' ''मातीकाम'' | २३४.४० |
| ११) | ''एम'' वृक्षारोपण | १.०० |
| १२) | '' ओ'' संकिर्ण | १.५० |
| १३) | ''पी'' देखभाल व दुरुस्ती | ६.७५ |
| १४) | ''क्यू'' हत्यारे व संयंत्रे | २.०० |
| १५) | ''आर'' दळणवळण | २.७२ |
| १६) | वितरीका भाग ३ | ५९.०३ |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | १५७६.७३ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | २५३.७० |
| | एकूण | १८३०.४३ |

**तक्ता क्रमांक २**
**देवर्जन मध्यम प्रकल्प, ता. उद्गीर, जि. लातुर.**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा/देवर्जन/२००९/(५८/०९)/म.प्र.,**
**दिनांक ३०/७/१० चे सहपत्र.**

**द्वितीय सुधारीत अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| (अ) | प्रत्यक्ष खर्च<br>१) शीर्षकामे व कालवे<br>२) वितरीका | <br>१५१७.७०<br>५९.०३ |
| | एकूण (अ) | १५७६.७३ |
| (ब) | अधिक<br>३) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) २० टक्के<br>४) हत्यारे व अवजारे २.५ टक्के दराने (ब जमीन क्यू हत्यारे वगळून)<br>५) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ३.० टक्के (आस्थापना खर्चावर)<br>६) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>१८०.७२<br>२२.७५<br>५.४२ |
| | एकूण (ब) (३ +४ +५ +६) | २०८.८९ |
| | एकूण अ + ब | १७८५.६२ |
| (क) | वजाती<br>१) विशेष टी अँड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतींच्या किंमतीवर १५ टक्के दराने<br>४) रेसीडयुअल व्हॅल्यू @ १० टक्के नॉन रेटेड इक्विपमेंटस | <br>१.३५<br><br>२.०८<br>०.०२<br>- |
| | एकूण वजाती | (--)३.४५ |
| | एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ ब) - क | १७८२.१७ |
| (ड) | अप्रत्यक्ष खर्च<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.७५ टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.० टक्के शिर्षकामे (बी जमीन वगळून)<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>३८.७१<br>८.५०<br><br>१.०५ |
| | एकूण अप्रत्यक्ष खर्च | ४८.२६ |
| | प्रकल्पाची एकूण किंमत | १८३०.४३ |